**सन २०१९-२०या आर्थिक वर्षाकरीता वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण ( २४०६ ८६०४) निधी वितरण करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१९/प्र.क्र.८४/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक - ९ मार्च २०२०**

वाचा-:

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे क्रमांक - कक्ष -१/ पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.१४/४४४/२०१९-२०, दि. २४.०६.२०१९

२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ८ जुलै २०१९

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक **साववि-२०१९/प्र.क्र.८४/फ-११, दि. १६ जूलै २०१९**

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१४/१५१०/२०१९-२०, दि. ०६.०१.२०२०

प्रस्तावना-:

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत **"वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण ( २४०६ ८६०४) अर्थसहाय्य -३३"** या योजनेंतर्गत सन २०१९-२० करिता ३३.००लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. या योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयानुसार अर्थसंकल्पित रकमेच्या ६०%च्या मर्यादेत म्हणजेच रु.१९.८० लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यापैकी संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार रु. १०.३३ लक्ष निधी वितरित करण्यात आला आहे. संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी उर्वरित रु. २२.९८ लक्ष निधी वितरित करण्याची विनंती केलेली आहे . परंतू ६० % च्या मर्यादेत शिल्लक असलेला रु. ९.४७ लक्ष निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-:

सन २०-२०१९ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणा-या **वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६ ८६०४) या** योजनेकरिता प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे रु. ९.४७ लक्ष निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी विहित आराखडयाप्रमाणे विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी .

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.तसेच यापूर्वी वितरित केलेला

निधी इतरत्र वळविण्यात आला नाही तसेच इतर खात्यात ठेवण्यात आलेला नाही याबाबतचे प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय वरील निधी वितरित करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा .तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधानमुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

५. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-७,**
**२४०६ वनीकरण व वन्यजीवन,**
**वनीकरण,१०२ सामाजिक क्षेत्रीय वनीकरण**
**(०१)(०३) वनीकरणाद्वारे सागरी किनारपटटीचे सरंक्षण (२४०६ ८६०४)**
**अर्थसहाय्य.**

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक ,अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३०९११५६३३७७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DAMODHAR SITARAM DALVI

Digitally signed by DAMODHAR SITARAM DALVI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=ef72079fa46879c38e604681191069c57000e73e78700748258ef7a9095f84d9, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f62a7252ed770981b2324209adc4d21c5f260d6817740e3a114e91e153b61422, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DAMODHAR SITARAM DALVI
Date: 2020.03.09 12:02:54 +05'30'

**( दामोधर दळवी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य ,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व व विकास ) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण,ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
५. सर्व विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०३२.
९. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१०. वित्त विभाग,व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२,,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/फ-११.